रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाच्या आणि त्याच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांचे नामकरण करण्याबाबत. तसेच संचालनालयाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयातील विविध संवर्गाच्या पदनामात बदल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक कौविअ-२०१५/प्र.क्र.८८/प्रशा-२**
मुख्य इमारत, २ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १ जुलै, २०१५.

वाचा - : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईओ-१०१५/प्र.क्र.०६/२०१५/दहा दिनांक १५ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना :-**

रोजगाराबाबत बदलत्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिस्थितीत कौशल्य विकास व उद्योगकतेस अधिक प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने तसेच, या कार्यक्रमाकडे अधिक प्रभावीपणे लक्ष पुरविले जावे या उद्देशाने केंद्र शासनाने स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता या मंत्रालयाची निर्मिती केली आहे. केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यामध्ये देखील स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता विभागाची स्थापना सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५/०१/२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. विभागाच्या नावात बदल केल्यामुळे विभागाच्या अधिनस्त असलेल्या रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाच्या तसेच संचालनालयाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या नावात आणि संचालनालयातील विविध संवर्गाच्या पदनामात सुसंगत बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १५/०१/२०१५ च्या शासन निर्णयान्वये या विभागाच्या नावामध्ये झालेल्या बदलास अनुलक्षून या विभागाच्या अधिनस्त असलेल्या रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाचे नामकरण " कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय " असे करण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे नामकरण करण्यात आलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाच्या अधिपत्याखाली असलेल्या कार्यालयांच्या नावात पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | कार्यालयाचे सध्याचे नाव | एकूण संख्या | कार्यालयाचे प्रस्तावित नाव |
|---|---|---|---|
| १ | रोजगार व स्वयंरोजगार विभागिय मुख्यालय | ६ | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, विभागिय मुख्यालय, मुबंई/पुणे/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती/ नागपूर |
| २ | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र | ३५ | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, ३५ जिल्हे |
| ३ | विद्यापीठ रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र | ६ | विद्यापीठ कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, माहिती व मार्गदर्शन केंद्र, मुबंई/ पुणे/ कोल्हापूर/ औरंगाबाद/ अमरावती/नागपूर |
| ४ | आदिवासी उमेदवारांकरीता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र | ८ | आदिवासी उमेदवारांकरीता कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता माहिती व मार्गदर्शन केंद्र, मंचर (पुणे)/ किनवट (नांदेड)/देवरी(गोंदिया) / चंद्रपूर / गडचिरोली/ अचलपूर (अमरावती)/कळवण (नाशिक)/रावेर(जळगाव) |
| ५ | अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, मुबंई | १ | अपंगार्थ विशेष कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुबंई. |
| ६ | रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र(तांत्रिक), मुबंई. | २ | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, (तांत्रिक), मुंबई |
| ७ | रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, (पनवेल, कामठी) | २ | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र(पनवेल,कामठी) |

३. वर नमूद केल्याप्रमाणे नामकरण करण्यात आलेल्या “कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय” व या संचालनालनालयाच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयांतील विविध संवर्गांच्या पदनामात खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | पदाचे संवर्गाचे सध्याचे पदनाम | पद संख्या | नवीन पदनाम |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त, रोजगार स्वयंरोजगार व कौशल्य विकास | १ | आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता |
| २ | उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय | १ | उपसंचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय |
| ३ | उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागिय मुख्यालय | ६ | उपसंचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, विभागिय मुख्यालय |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | सहायक संचालक , रोजगार व स्वयंरोजगार | ४६ | सहायक संचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता |
| ५ | रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी | १११ | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी |
| ६ | कनिष्ठ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी | १३८ | कनिष्ठ कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी |

४. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९७९/का१२ दिनांक २३/०६/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०७०११३२१११९५०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Devappa Annappa Gawade

Digitally signed by Devappa Annappa Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Devappa Annappa Gawade
Date: 2015.07.01 13:24:24 +05'30'

(दे.आ.गावडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१)महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञेता / लेखा व परिक्षा ), मुंबई/ नागपूर
२) राज्यपाल यांचे सचिव
३) मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४ मा.मुख्यमंत्री, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) मा.राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांचे स्वीय सहायक.
९) सर्व मंत्रालयीन विभाग
१०) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११) सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-१८ (र.व.का.)/१२
१२) सामान्य प्रशासन विभाग कार्यासन ९/९-अ/१०-अ
१३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई. आणि संचालनालयाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये.
१४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५) सर्व कोषागार अधिकारी.
१६) निवड नस्ती.